**श्री. प्रशांत वसंतराव राजे, नगर रचनाकार, नगरपरिषद, इचलकरंजी, जि. कोल्हापूर यांची स्वेच्छासेवानिवृत्ती मंजूर करुन त्यांना शासन सेवेतून कार्यमुक्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्र. स्वेच्छानि-४९१७/७५१/प्र.क्र.९८/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २५ मे, २०१७.

वाचा :- १. श्री. प्रशांत वसंतराव राजे, नगर रचनाकार (गट-अ) यांचा दि.१३.०२.२०१७ रोजीचा अर्ज.
२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/प्रवरा-नर/स्वेच्छासेवानिवृत्ती/प्रशा-१ब/२३२५, दि.२९.०४.२०१७.

**प्रस्तावना :-**

श्री. प्रशांत वसंतराव राजे, नगर रचनाकार यांनी प्रकृतीच्या कारणास्तव ऐच्छिक स्वेच्छा सेवानिवृत्ती घेण्याची इच्छा व्यक्त करुन दि.१३.०२.२०१७ रोजीच्या अर्जान्वये ०३ महिने पूर्वसूचना (Notice) दिली आहे.

**०२.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन दि.२९.०४.२०१७ रोजीच्या पत्रान्वये श्री. प्र. व. राजे, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांची स्वेच्छा सेवानिवृत्तीची पूर्वसूचना स्वीकारण्यात येऊन त्यांना दि.१६.०५.२०१७ (म.पू.) पासून शासन सेवेतून कार्यमुक्त करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केला आहे. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील नियम ६६ (१) मधील तरतुदीनुसार श्री. प्रशांत वसंतराव राजे, नगर रचनाकार, नगरपरिषद इचलकरंजी, जि. कोल्हापूर यांची दि.१३.०२.२०१७ रोजीची स्वेच्छा सेवानिवृत्तीची पूर्वसूचना स्वीकारुन त्यांना दि.१६.०५.२०१७ (म.पू.) पासून शासन सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे समजण्यात यावे, यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** श्री. प्र. व. राजे, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांच्याविरुद्ध सद्यस्थितीत कोणतीही विभागीय चौकशी / न्यायालयीन / लाचलुचपत / शिस्तभंगविषयक प्रकरण सुरु अथवा प्रलंबित / प्रस्तावित नाही तसेच त्यांच्याकडून कोणत्याही प्रकारचे शासकीय येणे शिल्लक नाही, या अटींच्या अधीन राहून त्यांना स्वेच्छा सेवानिवृत्त होण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**०३.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांनी श्री. प्र. व. राजे, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांचेकडे स्वेच्छा सेवानिवृत्तीपूर्व शासनाची येणे असलेली रक्कम तसेच वेतन पडताळणी पथकाकडून वेतननिश्चितीची पडताळणी करताना त्यांना वेतन व भत्त्यांचे अतिप्रदान झाल्याचे निदर्शनास आल्यास त्या सर्व रकमांची वसुली त्यांच्या सेवा उपदानातून वसूल करावी.

**०४.** संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या प्रकरणी आवश्यक ते कार्यकारी आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

**०५.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१७०५२५१४५५१६२५२५ असा आहे. हा शासन आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.05.29 16:01:22 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२. महालेखापाल,/ महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई.
४. महालेखापाल,/ महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर.
५. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
७. सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
८. सहायक संचालक, नगर रचना, कोल्हापूर शाखा, कोल्हापूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
१०. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३. श्री. प्रशांत वसंतराव राजे, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित), नगरपरिषद इचलकरंजी, जि.कोल्हापूर यांना (संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)
१४. निवडनस्ती / नवि-२७.

*****